राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगासाठी सन २०१४- १५ करिता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः GAD-मातंस ०८३/८/२०१४ /का.३९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख : ३० डिसेंबर, २०१४.

संदर्भ :- शासन निर्णय क्रमांकः GAD-मातंस ०८३/८/२०१४ /का.३९, दि.१४.७.२०१४

**शासन निर्णय :**

राज्यातील विविध सामाजिक प्रश्नांमध्ये समाजाच्या हितासाठी विज्ञान व तंत्रज्ञानाचा अवलंब करणे, त्याचा प्रसार करणे आणि त्यास चालना देणे या उद्देशाने सन २००४ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ अन्वये राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. उपरोक्त अधिनियमाच्या नियम क्रमांक १४ नुसार राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाकरिता शासनाच्या एकत्रित निधीतून अनुदानाच्या स्वरुपात प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये निधी अदा करावयाचा आहे. त्यानुसार सन २०१४-१५ करिता विज्ञान व तंत्रज्ञान आयोगासाठी मंजूर अर्थसंकल्पीय तरतूद रुपये २८,००,००,०००/- (रुपये अठ्ठावीस कोटी फक्त) एवढी आहे. यापूर्वी चालू आर्थिक वर्षामध्ये राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगासाठी सहाय्यक अनुदान म्हणून रुपये १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) मंजूर करण्यात आले होते. सद्यस्थितीत निधीची उपलब्धता विचारात घेऊन राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोगाला रुपये ६,८०,००,०००/- (रुपये सहा कोटी ऐंशी लाख फक्त) मंजूर करण्यात येत आहेत.

२. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (वि.तं.क.) यांनी रुपये ६,८०,००,०००/- (रुपये सहा कोटी ऐंशी लाख फक्त) या रकमेचे देयक सादर करुन मंजूर करुन घ्यावे. संबंधित रकमेचा धनादेश “सदस्य-सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग ” यांच्या नावे काढण्यात यावा व आयोगाकडे सुपूर्द करण्यात यावा.

३. सदर अनुदानाच्या रकमेचा विनियोग सन २००४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १५ मधील नमुद प्रयोजनांसाठीच करण्यात यावा तसेच त्यामधून खर्च करताना वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. या अनुदानाच्या विनियोगाची तपासणी करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र व कार्यक्रमांचा सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

४. वरील खर्च मागणी क्रमांक ए-५, २२५१ सचिवालय, सामाजिक सेवा, ०९० सचिवालय, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००) (०३) विज्ञान व तंत्रज्ञान यामध्ये समन्वय व

संशोधन (२२५१ ००४२), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा व तो सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. या शासन ज्ञापनास वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९ च्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग एक अंतर्गत अ.क्र.२७, नियम क्रमांक १४९ अन्वये मंजुरी देण्यात येत असून सहाय्यक अनुदान मंजूर करताना वरील अधिनियमांतर्गत वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात आले आहे. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०८/१४४३, दि. ५ डिसेंबर, २०१४ व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ११०७/१४,/व्यय-४ दिनांक ९ डिसेंबर, २०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२३०१२२५५८७८११ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suryakant Hari Jadhav

Digitally signed by Suryakant Hari Jadhav
DN: c=IN, o=Directorate of Information Technology, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0a44bfcf65c439067862d8ed211df5b93ae53d58a3c62126ea678369534692d0, cn=Suryakant Hari Jadhav
Date: 2014.12.30 12:35:58 +05'30'

( सू.ह.जाधव )

सह सचिव (मा.तं.)

**प्रति,**

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४) सदस्य-सचिव, राजीव गांधी विज्ञान व तंत्रज्ञान आयोग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५) नियोजन विभाग (कार्यासन १४४३), मंत्रालय, मुंबई,
६) वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई,
७) सामान्य प्रशासन विभाग, का.३९ (रोख शाखा) (३ प्रती)
८) निवड नस्ती